एकाकी पदाच्या आरक्षणाबाबत....

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक: बीसीसी-1093/3187/प्र.क्र.171/93/16-ब,

मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 2 नोव्हेंबर, 1996.

पहा :- (1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-बीसीसी-1078/1810/263/16-ब, दिनांक 1 मार्च, 1989.

(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1088/1810/263/16-ब, दिनांक 15 सप्टेंबर, 1989.

(3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1093/3187/प्र.क्र.171/93/16-ब, दिनांक 21 फेब्रुवारी, 1994.

(4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1093/3187/प्र.क्र.171/93/16-ब, दिनांक 12 जुलै, 1996.

## शासन परिपत्रक

उपरोक्त समक्रमांकाच्या दिनांक 21 फेब्रुवारी, 1994 परिपत्रकान्वये "फक्त एकच पद ( Isolated ) असलेल्या संवर्गात सुरुवातीच्या अथवा त्यापुढील भरती वर्षात भरती/बढती बाबतचे आरक्षण लागू होणार नाही. म्हणजेच, हे आदेश निर्गमित केल्यानंतर ज्यांना, एकाकी पदावर नेमणूक पदोन्नती दिली जाईल ती ज्येष्ठता व पात्रता या आधारे व तात्पुरत्या स्वरुपात असेल, तसेच अशा नियुक्त्या मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाकडे दाखल केलेल्या याचिका क्र. 3381/91 च्या निर्णयाच्या अधीन राहून दिल्या जातील" असे आदेश देण्यात आले होते.

2. उपरोक्त याचिका क्र.3381/91 ही मागे घेण्यात आली असल्याने एकाकी पदावर नेमणुका करताना त्या औरंगाबाद खंडपीठाच्या क्र.3381/91 च्या निर्णयाच्या अधीन राहून देण्याची आवश्यकता नाही. तसेच यापूर्वी ज्या नियुक्त्या सदर न्यायालयीन प्रकरणाच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात आल्या होत्या त्या नियमित करण्याबाबत संबंधित अधिका-यांना आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याबाबत उपरोक्त दिनांक 12 जुलै, 1996 च्या परिपत्रकान्वये आदेश देण्यात आले आहेत.

3. वरीलप्रमाणे आदेश निर्गमित केल्यानंतरही काही कार्यालयांकडून एकाकी पदाला आता आरक्षण राहील किंवा कसे याबाबत या विभागाकडे विचारणा होत आहे. त्या संदर्भात असे स्पष्ट करण्यात येते की, एकाकी पदाला भरती व बढतीबाबत आरक्षण लागू होत नाही. तसेच आरक्षण लागू होत नसल्याने अनुशेषाचा प्रश्न उद्भवत नाही. एकाकी पदावर नेमणुका देताना केवळ ज्येष्ठता व पात्रता विचारात घेण्यात याव्या.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शा. हिरीजगनेर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

शा.म.मु.रोटा/सा.प्र.वि./पच-[illegible](4,500-11-96) (क्र.सा.प.)

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,

मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

उप मुख्यमंत्री यांचे सचिव,

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* आयुक्त, अनुसूचित जाती/जमाती, नवी दिल्ली,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

सर्व मंत्रालयीन विभाग,

सर्व सहाय्यक आयुक्त (मागासवर्ग कक्ष)/नागपूर/अमरावती/औरंगाबाद/कोकण विभाग/पुणे/नाशिक,

सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

सचिव, समाजकल्याण विभाग,

संचालक, समाजकल्याण, पुणे,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,

संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,

सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प, पुणे,

सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील इतर सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख.

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

---

* पत्राने.